२१

2011020314484400।

पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण

प्राधिकरणाच्या आस्थापनेवरील सहाय्यक अभियंता विद्युत व इतर पदांच्या वेतनश्रेणीस मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्र.पीसीएन १६९१/८५२/प्र.क्र.१३२/११/नवि-२२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : १० जुलै, १९९१.

पहा :- मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांचे पत्र क्र.डीए/प्रशासन/विद्युत/४३७७, दि.३०.५.९१.

शासन निर्णय :- महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ च्या ११३[६] व ११[१] अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन शासन यांद्वारे पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या सहाय्यक अभियंता, कनिष्ठ अभियंता व इलेक्ट्रॉनिक यांत्रिकी या पदांच्या त्यांच्या नांवा समोर दाखविलेल्या खालील वेतनश्रेण्यास मान्यता देण्याच्या पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाच्या प्रस्तावास मंजूरी देत आहे.

| पदाचे नांव | पदांची संख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|
| १] सहाय्यक अभियंता | १ | रु.२०००-६०-२३००-दरो-७५-३२००-१००-३५०० |
| २] कनिष्ठ अभियंता | १ | रु.१४००-४०-१८००-दरो-५०-२३०० |
| ३] इलेक्ट्रॉनिक यांत्रिक | १ | रु.९५०-२०-११५०-दरो-२५-१४००. |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

र.गो. साळगांवकर
[ र.गो.साळगांवकर ]
कार्यासन अधिकारी.

प्रति,

मुख्य कार्यकारी अधिकारी,
पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण,
निगडी, पुणे.